नवनिर्मित पालघर जिल्हयासाठी रोजगार हमी योजना प्रभागांतर्गत जिल्हा परिषद कार्यालयासाठी रोजगार हमी योजना कक्षासाठी पदे निर्माण करण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
नियोजन विभाग
शासन निर्णय क्रमांकः आस्थाप-२०१४/प्र.क्र.१६८/मग्रारो-३
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: : १३ नोव्हेंबर, २०१४.

वाचा

१) शासन निर्णय, नियोजन विभाग क्रमांकः आस्थाप-११०१/प्र.क्र.८७/रोहयो-३, दि.२९.०५.२००१
२) शासन निर्णय नियोजन विभाग क्रमांकः आवसं-२००९/प्र.क्र.१७७/मग्रारो-३ दि.०९.१२.२००९
३) शासन निर्णय नियोजन विभाग क्रमांकः आकृति-२०११/प्र.क्र.५/मग्रारो-३, दि.३१.०५.२०११
४) शासन शुध्दिपत्रक नियोजन विभाग क्रमांकः आकृति-२०११/प्र.क्र.५/मग्रारो-३, दि. १८.०७.२०११
५) शासन निर्णय नियोजन विभाग क्रमांकः आकृति-२०११/प्र.क्र.३/मग्रारो-३, दि. १९.१०.२०११
६) शासन निर्णय नियोजन विभाग क्रमांकः गोअअ-२०१२/प्र.क्र.५६/मग्रारो-३, दि. ०६.०२.२०१३
७) शासन निर्णय नियोजन विभाग क्रमांकः आस्थाप-२०१३/प्र.क्र.३/मग्रारो-३, दि. २४.०५.२०१३
८) शासन अधिसूचना महसूल व वन विभाग क्रमांकः प्राफेब-११०८/प्र.क्र.१६७/ठाणे/म-१०, दि.३१.०७.२०१४

प्रस्तावना

महसूल व वन विभाग क्रमांक : प्राफेब-११०८/प्र.क्र. १६७/ठाणे/ म-१०, दिनांक ३१.०७.२०१४ च्या अधिसूचनेन्वये ठाणे जिल्हयाचे विभाजन करुन दिनांक ०१.०८.२०१४ पासून पालघर, वसई, डहाणू, तलासरी, जव्हार, वाडा, मोखाडा आणि विक्रमगड या तालुक्यांचा समावेश करुन पालघर जिल्हा निर्माण करण्यात आला आहे. नवनिर्मित पालघर जिल्हयांतर्गत जिल्हा परिषदेतील विविध विभागांसाठी पदनिर्मिती करण्याचा एकत्रित प्रस्ताव समन्वयक म्हणून ग्राम विकास व जलसंधारण विभागाने उच्चस्तरीय सचिव समितीसमोर सादर केला. त्यामध्ये नंदूरबार परिषदेसाठी मंजूर करण्यात आलेल्या पदांच्या धर्तीवर पालघर जिल्हा परिषदेसाठी अधिकारी व कर्मचारी वृंदाची पदे संबंधित मंत्रालय विभागाने नव्याने निर्माण करण्यास उच्चस्तरीय सचिव समितीने मान्यता दिली आहे. त्यास अनुसरुन नवनिर्मित पालघर जिल्हयासाठी महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेची अंमलबजावणी करण्यासाठी जिल्हा परिषद कार्यालयातील रोजगार हमी योजना कक्षासाठी ६ पदे निर्मित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

नवनिर्मित पालघर जिल्हयासाठी महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेच्या अंमलबजावणीसाठी जिल्हा परिषद कार्यालयातील रोजगार हमी योजना कक्षासाठी पुढीलप्रमाणे ६ पदे निर्मित करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी (रुपयांत) | ग्रेड पे (रुपयांत) | पदांची संख्या |
|---|---|---|---|---|
| १ | कृषि अधिकारी | ९३००-३४८०० | ४६०० | १ |
| २ | गटविकास अधिकारी | ९३००-३४८०० | ४४०० | १ |
| ३ | सहाय्यक लेखाधिकारी | ९३००-३४८०० | ४४०० | १ |
| ४ | वरिष्ठ सहाय्यक | ५२००-२०२०० | २४०० | १ |
| ५ | लिपिक टंकलेखक | ५२००-२०२०० | १९०० | १ |
| ६ | शिपाई | ४४४०-७४४० | १३०० | १ |

२. जिल्हा प्रशासनाने गट - क व गट- ड या संवर्गातील पदे भरताना बाहयस्त्रोताव्दारे (outsourcing) पदे भरता येऊ शकतील किंवा कसे यासंदर्भात शक्यता पडताळून पद भरतीची प्रक्रिया अवलंबावी. त्याचबरोबर चतुर्थश्रेणी कर्मचा-यांची पदे भरताना शिपाई / पहारेकरी / नाईक / सफाईगार अशा वेगळया संवर्गाऐवजी multitasking स्वरुपाच्या जबाबदा-या देऊन पद भरती करता येऊ शकेल काय याची पडताळणी करुनच पद भरती प्रक्रिया अवलंबावी.

३. नवनिर्मित पालघर जिल्हा परिषदेतंर्गत नव्याने निर्माण करण्यात आलेल्या ६ पदांवरील अधिकारी/ कर्मचारी यांच्या नियुक्त्या संबंधित विभागांनी / विभाग प्रमुखांनी प्रतिनियुक्तीने तात्काळ कराव्यात.

४. महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेवर कार्यरत अधिकारी / कर्मचारी यांचे गोपनीय अहवाल लिहिण्यासाठी प्रतिवेदन अधिकारी व पुनर्विलोकन अधिकारी विभागाच्या दिनांक ०६.०२.२०१३ च्या शासन निर्णयान्वये घोषित करण्यात आले आहेत. सदर शासन निर्णयातील तरतूदी नवनिर्मित पालघर जिल्हा परिषदेतंर्गत रोजगार हमी योजना कक्षामध्ये नियुक्त करण्यात येणारे अधिकारी / कर्मचारी यांना लागू राहतील. तसेच सदर आदेशाची अंमलबजावणी २०१४-१५ या वर्षापासून लागू राहिल.

५. नवनिर्मित पालघर जिल्हा परिषदेतंर्गत नव्याने निर्माण करण्यात आलेल्या ६ पदांवरील खर्च “मागणी क्रमांक ओ-३, मुख्यशिर्ष-२५०५, ग्रामीण रोजगार-६०-इतर कार्यक्रम-००१ रोजगार हमी योजना-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-(०१)(०१) रोजगार हमी योजना (२५०५००२२)” या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सदर आदेश वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक : ३७२/२०१४/व्यय-१५, दिनांक २२.७.२०१४ अन्वये व उच्चस्तरीय सचिव समितीने दिनांक २५.७.२०१४ च्या बैठक क्रमांक ८५ व दिनांक ७.८.२०१४ च्या बैठक क्रमांक ८७ मध्ये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. विभागाच्या अ.क्र. १ व २ येथील अनुक्रमे दिनांक २९.०५.२००१ व दिनांक ०९.१२.२००९ च्या शासन निर्णयानुसार महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेच्या कामासाठी उपजिल्हाधिकारी (रोहयो) यांना “कार्यालय प्रमुख” म्हणून घोषित करण्यात आले आहे. त्यानुसार उपजिल्हाधिकारी (रोहयो) यांना शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक : विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५.०५.२००९ मधील अ.क्र. ३ नियम क्रमांक २ नुसार विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये “कार्यालय प्रमुख” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

८. विभागाच्या अ.क्र. ५ येथील दिनांक १९.१०.२०११ च्या शासन निर्णयानुसार महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेच्या कामासाठी जिल्हा परिषद कार्यालयातील काम सुलभतेने पार पाडण्यासाठी उप मुख्य कार्यकारी अधिकारी (सामान्य) यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात आले आहे. त्यानुसार नवनिर्मित पालघर जिल्हा परिषदेतंर्गत नव्याने निर्माण करण्यात आलेल्या ६ पदांच्या वित्तीय बाबी हाताळण्यासाठी उप मुख्य कार्यकारी अधिकारी (सामान्य) यांना महाराष्ट्र कोषागार नियम १९६८, खंड-१ मधील अ.क्र. १५६ नुसार विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच त्यांना सदर पदाचे अधिकार प्रदान करण्यात येत आहेत.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१११३१४२४०७२२१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pimpale Prashant R

Digitally signed by Pimpale Prashant R
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pimpale Prashant R
Date: 2014.11.14 12:29:39 +05'30'

**प्रशांत र.पिंपळे**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

| | | | |
|---|---|---|---|
| १ | मा. राज्यपाल यांचे सचिव. | ११ | सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा सह जिल्हा कार्यक्रम समन्वयक, मगांराग्रारोहयो. |
| २ | मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव. | १२ | मुख्य कार्यकारी अधिकारी, ठाणे / पालघर. |
| ३ | मा. मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव. | १३ | संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई. |
| ४ | अ. मु. स. (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई | १४ | अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई. |
| ५ | अ. मु. स. (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई. | १५ | कोषागार अधिकारी, ठाणे / पालघर. |
| ६ | अ. मु. स. (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई. | १६ | प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई. |
| ७ | प्रधान सचिव (ग्राम विकास), ग्रा. वि. पं. रा. विभाग, मर्झबान पथ, बांधकाम भवन, फोर्ट. | १७ | प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र १, मुंबई. |
| ८ | सचिव (लेखा व कोषागारे), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई. | १८ | सर्व सह सचिव/ उप सचिव, नियोजन विभाग (रोहयो), मंत्रालय, मुंबई. |
| ९ | सर्व विभागीय आयुक्त. | १९ | निवड नस्ती, मग्रारो- ३. |
| १० | सर्व जिल्हाधिकारी तथा जिल्हा कार्यक्रम समन्वयक, मगांराग्रारोहयो (मुंबई व मुंबई उपनगरे वगळून). | | |